३७००. देव दयाळ देव दयाळ । साहे कोल्हाळ बहुतांचा ॥१॥ देव उदार देव उदार । थोड्यासाटीं फार देऊं जाणे ॥ २ ॥ देव चांगला देव चांगला । तुका लागला चरणीं ॥ ३ ॥

३७०१. देव भला देव भला । मिळोनि जाय जैसा त्याला॥१॥ देव उदार उदार । देतां नाहीं थोडें फार ॥ २ ॥ देव बळी देव बळी । जोडा नाहीं भूमंडळीं ॥ ३ ॥ देव व्हावा देव व्हावा । आवडे तो सर्वा जीवां ॥ ४ ॥ देव चांगला देव चांगला । तुका चरणीं लागला ॥ ५ ॥

३७०२. देव पाहों देव पाहों । उंच ठायीं उभें राहों ॥ १ ॥ देव देखिला देखिला । तो नाहीं कोणा भ्याला ॥ २ ॥ देवासी कांहीं मागों मागों । जीव भाव त्यासी सांगों ॥ ३ ॥ देव जाणे देव जाणे । पुरवी मनींचिये खुणे ॥ ४ ॥ देव कातर देव कातर । तुका म्हणे अभ्यंतर ॥ ५ ॥

३७०३. देव आमचा आमचा । जीव सकळ जीवांचा ॥ १ ॥ देव आहे देव आहे । जवळी आम्हां अंतरबाहे ॥ २ ॥ देव गोड देव गोड । पुरवी कोडाचेंही कोड ॥ ३ ॥ देव आम्हां राखे राखे । घाली कळिकाळासी काखे ॥ ४ ॥ देव दयाळ देव दयाळ । करी तुक्याचा सांभाळ ॥ ५ ॥

३७०४. देवाच्या प्रसादें करा रे भोजन । व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥ १ ॥ ब्रह्मादिकांसि हें दुर्लभ उच्छिष्ट । नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥ २ ॥ अवघियांपुरतें वोसंडलें पात्र । अधिकार सर्वत्र आहे येथें ॥ ३ ॥ इच्छादानी येथें ओळला समर्थ । अवघेंचि आर्त पुरवितो ॥४॥ सरे येथें ऐसें नाहीं कदाकाळीं । पुढती वाटे कवळी घ्यावें ऐसें ॥ ५ ॥ तुका म्हणे पाक लक्षुमीच्या हातें । कामारी सांगातें निरुपम ॥ ६ ॥

३७०५. देवाची ते खूण आला ज्याच्या घरा । त्याचे पडे चिरा संसारासी ॥ १ ॥ देवाची ते खूण करावें वाटोळें । आपणा वेगळें राहों नेदी ॥ २ ॥ देवाची ते खूण गुंतों नेदी आशा । ममतेच्या

पाशा शिवों नेदी ॥ ३ ॥ * देवाची ते खूण करावें तोंडाळ । आणिक सकळ जग हरी ॥४॥ देवाची ते खूण झाला ज्यासी संग। त्याच्या झाला भंग मनुष्यपणा ॥ ५ ॥ देवाची ते खूण गुंतों नेदी वाचा । लागों असत्याचा मळ नेदी ॥६॥ पहा देवें तेंची बळकाविलें स्थळ । तुक्यापें सकळ चिन्हें त्याचीं ॥ ७ ॥

३७०६. प्रथमभेटी आलिंगण । मग चरण वंदावे ॥ १ ॥ ऐसा माझा भोळा बाप । हरी ताप कवळोनि ॥ २ ॥ न सांगतां शीण भाग । पांडुरंग जाणतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे कृपावंतें । द्यावें भातें न मागतां ॥ ४ ॥

३७०७. आवडीनें धरिलीं नांवें । प्रियभावें चिंतन ॥ १ ॥ वेडा झाला वेडा झाला । लांचावला भक्तीसी ॥ २ ॥ निचाड हा चाड धरी । तुळसी करीं दळ मागें ॥ ३ ॥ धरिला मग न करी बळ । तुका म्हणे कळ पायीं ॥ ४ ॥

३७०८. देव राखे तया मारील कोण । न मोडे कांटा हिंडतां वन ॥ १ ॥ न जळे न बुडे नव्हे कांहीं । विष तेंही अमृत पाहीं । ॥ २ ॥ न चुके वाट न पडे फंदीं । नव्हे कधीं यमबाधा ॥ ३ ॥ तुका म्हणे नारायण । येतां गोळ्या वारी बाण ॥ ४ ॥

३७०९. भक्त देवाघरिंचा सुना । देव भक्ताचा पोसणा ॥ १ ॥ येर येरां जडलें कैसें । जीवा अंग जैसें तैसें ॥ २ ॥ देव भक्ताची कृपाळु माता । भक्त देवाचा जनिता ॥ ३ ॥ तुका म्हणे अंगें । एक एकाचिया संगें ॥ ४ ॥

३७१०. भक्ताविण देवा । कैंचें रूप घडे सेवा ॥ १ ॥ शोभविलें येरयेरां । सोनें एके ठायीं हिरा ॥ २ ॥ देवाविण भक्ता । कोण देतें निष्कामता ॥ ३ ॥ तुका म्हणे बाळ । माता जैसें स्नेहजाळ ॥ ४ ॥

३७११. घेऊनियां चक्र गदा । हाचि धंदा करीतो ॥१॥ भक्ता राखे पायापासीं । दुर्जनासी संहारी ॥ २ ॥ अव्यक्त तें आकारलें । रूपा आलें गुणवंत ॥ ३ ॥ तुका म्हणे पुरवी इच्छा । जया तैसा विठ्ठल ॥ ४ ॥

---

* देवाची ते खूण तोडी मायाजाळ। आणि हें सकळ जग हरी ॥

३७१२. करितां कोणाचेंही काज । नाहीं लाज देवासी ॥ १ ॥ बरें करावें हें काम । धरिलें नाम दीनबंधु ॥२॥ करूनि अराणूक पाहे । भलत्या साह्य व्हावया ॥३॥ बोले तैसी करणी करी । तुका म्हणे एक हरी ॥ ४ ॥

३७१३. कृपावंत किती । दीन बहु आवडती ॥ १ ॥ त्यांचा भार वाहे माथां । करी योगक्षेमचिंता ॥ २ ॥ भुलों नेदी वाट । करीं धरूनि दावी नीट ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवें । अनुसरल्या एक भावें ॥ ४ ॥

३७१४. एवढा प्रभू भावें । तेणें संपुष्टीं रहावें ॥ १ ॥ होय भक्तीं केला तैसा । पुरवी धरावी ते इच्छा ॥२॥ एवढा जगदानी । मागे तुळसीदळ पाणी ॥ ३ ॥ आला नांवारूपा । तुका म्हणे झाला सोपा ॥ ४ ॥

३७१५. अनंत ब्रह्मांडें । एकें रोमीं ऐसें धेंडें ॥ १ ॥ तो या गौळियांचे घरीं । उंबरा चढतां टेंका धरी ॥ २ ॥ मारिले दैत्य गाढे । ज्यांचे पुराणीं पवाडे ॥ ३ ॥ तुका म्हणे कळा । अंगीं जयाच्या सकळा ॥ ४ ॥

३७१६. लाभ पुढें करी । घात नारायण वारी ॥ १ ॥ ऐसी भक्तांची माउली । करी कृपेची साउली ॥ २ ॥ माया बाळकासी । जीव भाव वेची तैसी ॥ ३ ॥ तुका म्हणे नाड । नाहीं शरणागता * आड ॥ ४ ॥

३७१७. शूरत्वासी मोल । नये कामा फिके बोल ॥ १ ॥ केला न संडी कैवाड । जीवेंसाठीं तों हे × होड ॥ २ ॥ धीर तो कारण । साह्य होतो नारायण ॥ ३ ॥ तुका म्हणे हरि । दासां रक्षितो निर्धारीं ॥ ४ ॥

३७१८. + सत्य सत्य देतो फळ । नाहीं लागताचि बळ ॥१॥ ध्यावे देवाचे ते पाय । धीर सकळ उपाय ॥ २ ॥ करावीच चिंता ।

* चाड. × कोड. + सत्य सत्यें देतें फळ ॥

नाहीं लागत तत्त्वता ॥ ३ ॥ तुका म्हणे भावें। होतें ÷ सकळ बरवें ॥ ४ ॥

३७१९. भाविकां हें वर्म सांपडलें निकें। सेविती कवतुकें धणीवरी ॥ १ ॥ इच्छितील तैसा नाचे त्यांचे छंदें। वंदितील पदें सकुमारें ॥२॥ विसरले मुक्ति भक्तिच्या अभिळासें। ओढत सरिसें सुख आलें ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं मागायाची आस। पांडुरंग त्यांस विसंबेना ॥ ४ ॥

३७२०. चित्तीं नाहीं आस। त्याचा पांडुरंग दास ॥ १ ॥ असे भक्तांचिये घरीं। काम न सांगतां करी ॥ २ ॥ अनाथाचा बंधु। अंगीं असे हा संबंधु ॥ ३ ॥ तुका म्हणे भावें। देवा सत्ता राबवावें ॥ ४ ॥

३७२१. वैद्य एक पंढरिराव। अंतर्भाव तो जाणे ॥ १ ॥ रोगा ऐसा द्याव्या वल्ली। जाणे झाली बाधा ते ॥ २ ॥ नेदी रुका वेचों मोल। पाहे बोल प्रीतीचे ॥३॥ तुका म्हणे दयावंता। सदा चिंता दीनांची ॥ ४ ॥

३७२२. अभिमानी पांडुरंग। गोवा काशाचा हो मग ॥ १ ॥ अनुसरा लवलाही। नका विचार करूं कांहीं ॥२॥ कोठें राहातील पापें। झालिया हो अनुतापें ॥ ३ ॥ तुका म्हणे येचि घडी। उभ्या पावईल थडी ॥ ४ ॥

३७२३. भय हरिजनीं। कांहीं न धरावें मनीं ॥१॥ नारायणा ऐसा सखा। काय जगाचा हा लेखा ॥ २ ॥ चित्त वित्त हेवा। समर्पून राहा देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे मन। असों द्यावें समाधान ॥ ४ ॥

३७२४. मधुरा उत्तरासवें नाहीं चाड। अंतरंगीं वाढ प्रेम असो ॥ १ ॥ प्राणावेगळा न करी नारायण। मग नसो ज्ञान मूर्ख बरा ॥ २ ॥ जननिंदा होय तो बरा व्यापार। थोरवीचा भार कामा

÷ शरण म्हणवितां बरवें ॥

नये ॥ ३ ॥ तुका म्हणे भाव निष्ठावंत चित्तीं । दया क्षमा शांति सर्वांभूतीं ॥ ४ ॥

३७२५. न करावी चिंता । भय न धरावें सर्वथा ॥ १ ॥ दासां साहे नारायण । होय रक्षिता आपण ॥ २ ॥ नलगे परिहार । कांहीं योजावें उत्तर ॥ ३ ॥ न धरावी शंका । नये बोलों म्हणे तुका ॥४॥

३७२६. पाववील ठाया । पांडुरंग चिंतिलिया ॥ १ ॥ त्यासी चिंतिलिया मनीं । चिन्ता करी गंवसणी ॥ २ ॥ पावावया फळ । अंगीं असावें हें बळ ॥ ३ ॥ तुका म्हणे तई । सिद्धि वोळगती पायीं ॥ ४ ॥

३७२७. धीर नव्हे मनें । काय तयापाशीं उणें ॥ १ ॥ भार घातलियावरी । दासां नुपेक्षील हरी ॥ २ ॥ याच्या ऐसी आटी । द्यावी द्रव्याचिये साटीं ॥ ३ ॥ तुका म्हणे पोटें । देवा बहु केलें खोटें ॥ ४ ॥

३७२८. वर्णावे ते किती । केले पवाडे श्रीपति ॥ १ ॥ विश्वासिया घडे लाभ । देईल तरी पद्मनाभ ॥ २ ॥ भाव शुद्ध तरी । सांगितलें काम करी ॥३॥ तुका म्हणे भोळा देव । परि हा नागवी संदेह ॥ ४ ॥

३७२९. याचा तंव हाचि मोळा । देखिला डोळा उदंड ॥१॥ नेदी मग फिरों मागें । अंगा अंग संचरे ॥ २ ॥ कां गा याची नेणां खोडी । जीभा जोडी करितसे ॥ ३ ॥ पांघरे तें बहु काळें । घोंगडेंही ठायींचें ॥ ४ ॥ अंगीं वसेचि ना लाज । न म्हणे भाज कोणाची ॥ ५ ॥ सर्वसाक्षी अबोल्यानें । दुश्चित कोणे नसावें ॥६॥ तुका म्हणे धरिला हातीं । मग निश्चिती हरीनें ॥ ७ ॥

३७३०. पाचारितां धांवे । ऐसी ठायींची ही सवे ॥ १ ॥ बोले करुणावचनीं । करी कृपा लावी स्तनीं ॥ २ ॥ जाणे कळवळा । भावसिद्धींचा सोहळा ॥ ३ ॥ तुका म्हणे नाम । मागें मागें धांवे प्रेम ॥ ४ ॥

३७३१. विश्वंभरा वोळे । बहुत हात कान डोळे ॥ १ ॥ जेथें

असे तेथें देखे। मागितलें तें आईकें ॥ २ ॥ जें जें वाटें गोड। तैसें पुरवितो कोड ॥ ३ ॥ तुका म्हणे भेटी। कांहीं पडों नेदी तुटी ॥ ४ ॥

३७३२. देव भक्तालागीं करूं नेदी संसार। अंगें वारावार करोनि ठेवी ॥ १ ॥ भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा। म्हणोनि करंटा करोनि ठेवी ॥ २ ॥ स्त्री द्यावी गुणवंती तीपें गुंते आशा। यालागीं कर्कशा करूनि ठेवी ॥ ३ ॥ तुका म्हणे साक्ष मज आली देखा। आणीक या लोकां काय सांगों ॥ ४ ॥

३७३३. करीं ऐसी धांवाधांवी। चित्त लावीं चरणापें ॥ १ ॥ मग तो माझा मायबाप। घेईल ताप हिरूनी ॥२॥ बहुतांच्या मतें गोवा। होऊं जीवा नेदावा ॥ ३ ॥ तुका म्हणे करुणा बोलें। धीर विठ्ठलें निघेना ॥ ४ ॥

३७३४. जाणे अंतरींचा भाव। तोचि करितो उपाव ॥ १ ॥ नलगे सांगावें मागावें। जीवें भावें अनुसरावें ॥ २ ॥ अविनाश घ्यावें। फळ धीर धरोनि ॥ ३ ॥ बाळा न मागतां भोजन। माता घाली पाचारून ॥ ४ ॥ तुका म्हणे तरी। एकीं लंघियेले गिरी ॥ ५ ॥

३७३५. काळाचिये सत्ता ते नाहीं घटिका। पंढरीनायका आठवितां ॥ १ ॥ सदा काळ गणना करी आयुष्याची। कथेचे वेळेची आज्ञा नाहीं ॥ २ ॥ याकारणें माझ्या विठोबाची कीर्ति। आहे हें त्रिजगतीं थोर वाट ॥ ३ ॥ तुका म्हणे जन्मा आलियाचें फळ। स्मरावा गोपाळ तेंचि खरें ॥ ४ ॥

३७३६. सत्य संकल्पाचा दाता नारायण। सर्व करी पूर्ण मनोरथ ॥ १ ॥ येथें अळंकार शोभती सकळ। भावबळें फळ इच्छेचें तें ॥ २ ॥ अंतरींचें बीज जाणे कळवळा। व्यापक सकळां ब्रह्मांडाचा ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं चालत तांतडी। प्राप्त काळ घडी आल्याविण ॥ ४ ॥

३७३७. मायबापें सांभाळिती। लोभाकारणें पाळिती ॥ १ ॥

तैसा नव्हे देवराव । त्याचा कृपाळू स्वभाव ॥ २ ॥ मनासारिखें न होतां । बाळकासी मारी माता ॥ ३ ॥ तुका म्हणे सांगूं किती । बाप लेंकासी मारिती ॥ ४ ॥

३७३८. न भिळती एका एक । जये नगरींचे लोक ॥ १ ॥ भलीं तेथें राहूं नये । क्षणें होईल न कळे काय ॥ २ ॥ न करितां अन्याय बळें करीती अपाय ॥ ३ ॥ नाहीं पुराणाची प्रीति । ठायीं ठायीं पंचाइती ॥४॥ भल्या बुऱ्या मारी । होतां कोणी न विचारी ॥ ५ ॥ अविचाऱ्या हातीं । देऊनि प्रजा नागविती ॥ ६ ॥ तुका म्हणे दरी । सुखें सेवावी ते बरी ॥ ७ ॥

३७३९. लचाळाच्या कामा नाहीं ताळावाळा । न कळे ओंगळा उपदेश ॥ १ ॥ वचनचर्येची न कळे चांचणी । ऐसी संघट्टनीं अमंगळ ॥ २ ॥ समय न कळे वेडगळ बुद्धि । विजाती ते शद्धि चांच चाट ॥ ३ ॥ तुका म्हणे याचा धिकारचि बरा । बहुमति खराहूनि हीन ॥ ४ ॥

३७४०. हेंदऱ्याचे भरितां कान । हलवी मान भोंक रितें ॥१॥ नाहीं मी येथें सांगों स्पष्ट । भावें नष्ट घेत नाहीं ॥ २ ॥ अवगुणी बाटलें चित्त । तया हित आतळे ना ॥ ३ ॥ तुका म्हणे फाजित-खोरा । म्हणतां बरा उगा रहा ॥ ४ ॥

३७४१. अतित्याई बुडे गंगे । पाप लागे त्याचें त्या ॥ १ ॥ हे तों आपुलिया गुणें । असे जेणें योजिलें ॥२॥ अवचटें अग्नि जाळी । न सांभाळी तो दुःख पावे ॥ ३ ॥ जैसें तैसें दावी आरसा । नकट्या कैसा पालटे ॥ ४ ॥

३७४२. गेला तरी जावो सुखें नरकासी । कळंकी यात्रिशीं शिवों नये ॥ १ ॥ रजस्वला करी वेलासी आघात । अंतर तों हित दुरी बरें ॥ २ ॥ उगीच कां आलीं नासत्रावीं फळें । विटाळ विटाळें कालवूनि ॥ ३ ॥ तुका म्हणे लोणी घालोनि शेणांत । उपेगाची मात काय असे ॥ ४ ॥

३७४३. जीवींचें जाणावें या नांवें आवडी । हेकड तें ओढी

अमंगळ ॥ १ ॥ चित्ताच्या संकोचें कांहींच न घडे । अतिशयें वेडे चार तेचि ॥ २ ॥ काळाविण कांहीं नाहीं रुचों येत । करूनि संकेत ठेवियेला ॥ ३ ॥ तुका म्हणे कळे वचनें चांचणी । काय बोलवूनि वेळोवेळां ॥ ४ ॥

३७४४. वेशा नाहीं बोल अवगुणा दूषिलें । ऐशा बोला भले झणीं क्षोभा ॥ १ ॥ कोण नेणे अन्न जीवाचें जीवन । विष मेळवण विष होय ॥ २ ॥ सोनें शुद्ध नेणे कोण हा विचार । डांकें हीनवर केलें त्यासी ॥ ३ ॥ याती शुद्ध परि अधम लक्षण । वायां गेलें तेणें सोंग हित ॥ ४ ॥ तुका म्हणे शूर तोचि पावे मान । आणीक मंडण भार वाहीं ॥ ५ ॥

३७४५. आचरणा ठाव । नाहीं अंगीं स्वतां भाव ॥ १ ॥ करवी आणिकांचे घात । खोडी काढूनि पंडित ॥ २ ॥ श्वानाचिया परी । मिष्टान्नासी विटाळ करी ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसा । सटवेची ना पांचा दिसां ॥ ४ ॥

३७४६. तेज्या इशारती । तट्टा फोकावरी घेती ॥ १ ॥ काय सांगावें त्याहुनी । ऐका रे धरा मनीं ॥ २ ॥ नव्हे भांडखोर । धरूं ओढोनि पदर ॥ ३ ॥ तुका म्हणे तोंड । काळें करा खालीं मुंड ॥ ४ ॥

## अद्वैतपर अभंग

३७४७. हरिः ॐ तत्सदिति सूत्राचें जें सार । कृपेचा सागर पांडुरंग ॥ १ ॥ * हरिः ॐ दत्त उदात्त अनुदात्त । प्रचुररहित पांडुरंग ॥ २ ॥ सर्वस्व व्यापिलें सर्वांही निराळें । वेदाचें जें मूळ तुका म्हणे ॥ ३ ॥

३७४८. पाहतां तव एकला दिसे । कैसा असे व्यापक ॥ १ ॥

---

* कांहीं प्रतींत दुसऱ्या व तिसऱ्या कडव्याऐवजीं खालील कडवीं आढळतात.

हरिः ॐ सहित उदत अनुदत । प्रचुरीश्वरासहित पांडुरंग ॥ २ ॥
गौब्राह्मणहिता होऊनि निराळे । वेदाचें तें मूळ तुका म्हणे ॥ ३ ॥

ज्याचे त्याचे मिळणीं मिळे । तरी खेळे बहुरूपी ॥ २ ॥ जाणिवेचें नेदी अंग । + दिसे रंग निवडेना ॥ ३ ॥ तुका म्हणे हेचि ठायीं । हें तों नाहीं सर्वत्र ॥ ४ ॥

३७४९. जीवाचें जीवन अमृताची तनु । ब्रह्मांडभूषणु नारायण ॥ १ ॥ सुखाचा सांगात अंतकासी अंत । निजाचा निवांत नारायण ॥ २ ॥ गोडाचेंही गोड हर्षाचेंही कोड । प्रीतीचाही लाड नारायण ॥ ३ ॥ भावाचा निज भाव नांवाचाही नांव । अवघा पंढरिराव अवतरलासे ॥ ४ ॥ तुका म्हणे जें हें साराचेंही सार । माझा अंगीकार तेणें केला ॥ ५ ॥

३७५०. जयापासोनि सकळ । महीमंडळ हें झालें ॥ १ ॥ तो एक पंढरीचा राणा । नये अनुमाना श्रुतीसी ॥ २ ॥ विवादती जयासाठीं । जगजेठी तो विठ्ठल ॥ ३ ॥ तुका म्हणे आकळ । आहे सकळ व्यापक ॥ ४ ॥

३७५१. पाहा रे हें दैवत कैसें । भक्तिपिसें भाविका ॥ १ ॥ पाचारिल्यासरिसें पावे । ऐसी सवे बराडी ॥ २ ॥ शुष्ककाष्ठीं गुरगुरी । लाज हरि न धरितां ॥ ३ ॥ तुका म्हणे अर्धनारी । ऐसीं धरीं रूपडीं हा ॥ ४ ॥

३७५२. देव जाणता देव जाणता । आपलीया सत्ता एकाएकीं ॥ १ ॥ देव चतुर देव चतुर । जाणोनि अंतर वर्ततसे ॥ २ ॥ देव निराळा देव निराळा । अलिप्त विटाळा तुका म्हणे ॥ ३ ॥

३७५३. ब्रह्म न लिंपे त्या मेळें । कर्मा अकर्मावेगळें ॥ १ ॥ तोचि एक तया जाणे । पावे अनुभविलें खुणें ॥ २ ॥ शौच अशौचाचे संधीं । तन आळा तनामधीं ॥ ३ ॥ पापपुण्या नाहीं ठाव । तुका म्हणे सहज भाव ॥ ४ ॥

३७५४. लक्षूनियां योगी पाहाती आभास । तें दिसे आम्हांस दृष्टीपुढें ॥ १ ॥ कर दोनी कटीं राहिलासे उभा । सांवळी हे प्रभा अंगकांती ॥ २ ॥ व्यापूनि वेगळें राहिलेंसें दुरी । सकळा अंतरीं

+ दिसों.

निर्विकार ॥ ३ ॥ रूप नाहीं रेखा नामही जयासी । आपुल्या मानसीं शिव ध्याय ॥ ४ ॥ अंत नाहीं पार वर्णा नाहीं थार । कुळ याति शिर हस्त पाद ॥ ५ ॥ अचेत चेतलें भक्तीचिया सुखें । आपुल्या कौतुकें तुका म्हणे ॥ ६ ॥

३७५५. तुझे वर्णूं गुण ऐसी नाहीं मती । राहिल्या त्या श्रुती मौनपणें ॥ १ ॥ मौनपणें वाचा थोंटावल्या चारी । ऐसें तुझें हरी रूप आहे ॥ २ ॥ रूप तुझें ऐसें डोळां न देखवे । जेथें हे झकवे ब्रह्मादिक ॥ ३ ॥ ब्रह्मादिक देवा कर्माची कचाटी । म्हणोनि आटाटी फार त्यांसी ॥ ४ ॥ तुका म्हणे तुझें गुण नाम रूप । आहेसी अमुप वाणूं काई ॥ ५ ॥

३७५६. स्तुति करूं तरी नव्हेचि या वेदा । तेथें माझा धंदा कोणीकडे ॥ १ ॥ परी हे वैखरी गोडावली सुखें । रसना रस मुखें इच्छीतसे ॥ २ ॥ रूप वर्णावया कोठें पुरे मती । रोमीं होती जाती ब्रह्मांडें हीं ॥ ३ ॥ तुका म्हणे तूंचि ऐसा एक साचा । ऐसी तंव वाचा झाली नाहीं ॥ ४ ॥

३७५७. ज्याचे गर्जतां पवाडे । श्रुतिशास्त्रां मौन पडे ॥ १ ॥ तेथें माझी वाचा किती । पुरे करावया स्तुति ॥ २ ॥ शिणलीं सहस्र तोंडें । शेष फणी ऐसें धेंडें ॥ ३ ॥ तुका म्हणे मही । पत्र सिंधु न पुरे शाई ॥ ४ ॥

३७५८. आवडीसारिखें संपादिलें सोंग । अनंत हीं मग झालीं नामें ॥ १ ॥ कळे ऐशा वाटा रचिल्या सुलभा । दुर्गम या नभाचाही साक्षी ॥ २ ॥ हातें जेवी एक मुखें मागे घास । माउली जयास तैसी बाळा ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें ध्यान विटेवरी । तैसाच गोजिरी दिसे मूर्ति ॥ ४ ॥

३७५९. तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोणी तीही त्रिभुवनीं ॥ १ ॥ सहस्रमुखें शेष शिणला बापुडा । चिरल्या धडा जिव्हा त्याच्या ॥ २ ॥ अव्यक्ता अलक्षा अपारा आनंदा । निर्गुणा सच्चितानंदा नारायणा ॥ ३ ॥ रूप नाम घेसी आपुल्या स्वइच्छा ।

होसी भाव तैसा त्याकारणें ॥ ४ ॥ तुका म्हणे जरी दाविसी आपणा । तरिच नारायणा कळों येसी ॥ ५ ॥

३७६०. जाणोनि नेणतें करीं माझें मन । तुझी प्रेमखूण देऊनियां ॥ १ ॥ मग मी व्यवहारीं असोनी वर्तत । जेवीं जळा आंत पद्मपत्र ॥ २ ॥ ऐकोनि नाइकें निंदास्तुती कानीं । जैसा का उन्मनीं योगिराज ॥ ३ ॥ देखोनि न देखें प्रपंच हा दृष्टी । स्वप्नींचिया सृष्टि चेइल्या जेवीं ॥ ४ ॥ तुका म्हणे ऐसें जालियावांचून । करणें तो शीण वाटतसे ॥ ५ ॥

३७६१. उपाधिवेगळे तुम्ही निर्विकार । कांहींच संसार तुम्हां नाहीं ॥ १ ॥ ऐसें मज करूनि ठेवा नारायणा । समूळ वासना नुरवावी ॥ २ ॥ निःसंग तुम्हांसी राहणें एकट । नाहीं कटकट साहों येत ॥ ३ ॥ तुका म्हणे नाहीं मिळों येत शिळा । रंगासी सकळा स्फटिकाची ॥ ४ ॥

३७६२. पडिला प्रसंग कां मी ऐसा नेणें । संकल्प ते मनें जिरवले ॥ १ ॥ चेष्टविले तरी सांगावें कारण । भक्ती ते * जीवन करावया ॥ २ ॥ लावूनियां दृष्टी घातली सामोरी । बैसली जिव्हारीं डसोन ते ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवा लाविला तो चाळा । करावें गोपाळा शीघ्र दान ॥ ४ ॥

३७६३. गायनाचे रंगीं । शक्ति अद्‌भुत हे अंगीं ॥ १ ॥ हें तों देणें तुमचें देवा । घ्यावी अखंडित सेवा ॥ २ ॥ अंगीं प्रेमाचें भरतें । नेघे उतार चढतें ॥ ३ ॥ तुका म्हणे वाणी । प्रेम अमृताची खाणी ॥ ४ ॥

३७६४. आम्ही तरी आस । झालों टाकोनि उदास ॥ १ ॥ आतां कोण भय धरी । पुढें मरणाचें हरी ॥ २ ॥ भलते ठायीं पडो । देह तुरंगीं हा चढो ॥ ३ ॥ तुमचें तुम्हांपाशीं ॥ आम्ही आहों जसीं तैसीं ॥ ४ ॥ गेले मानामान । सुखदुःखाचें खंडन ॥ ५ ॥ तुका म्हणे चित्तीं । नाहीं वागवीत खंती ॥ ६ ॥

---

* उजवण.

३७६५. आम्ही जाणों तुझा भाव । कैंचा भक्त कैंचा देव । बीजा नाहीं ठाव । कैंचें फळ शेवटीं ॥ १ ॥ संपादिलें बहु रूप । कैंचें पुण्य कैंचें पाप । नव्हतों आम्ही आप । आपणासी देखिलें ॥ २ ॥ एके ठायीं घरिच्या घरीं । न कळतां झाली चोरी । * तेथोंचि तें दुरी । जाणें येणें खुंटलें ॥ ३ ॥ तुका म्हणे धरूनि हातीं । उरी ठेविली मागुती । एकान्तीं लोकांतीं । देवभक्त-सोहळा ॥ ४ ॥

३७६६. भोगावरि आम्हीं घातला पाषाण । मरणा मरण आणियेलें ॥ १ ॥ विश्व तूं व्यापक काय मी निराळा । काशासाठीं बळा येऊं आतां ॥ २ ॥ काय सारूनियां काढावें बाहेरी । आणूनि भीतरीं काय ठेवूं ॥ ३ ॥ केला तरी उरे । $ वादच कोरडा । बळें घ्यावी पीडा स्वप्नींची ते ॥ ४ ॥ अवघेचि वाण आले तुम्हां घरा । मजुरी मजुरा रोजकीर्दी ॥ ५ ॥ तुका म्हणे कांहीं नेणें लाभ हानी । असेल तो धनी राखो वाडा ॥ ६ ॥

३७६७. तरुवर बीजापोटीं । बीज तरुवरा शेवटीं ॥ १ ॥ तैसें तुम्हां आम्हां झालें । एकीं एक सामावलें ॥२॥ उदकावरील तरंग । तरंग उदकाचें अंग ॥ ३ ॥ तुका म्हणे बिंबछाया । ठायीं पावली विलया ॥ ४ ॥

३७६८. क्षरला सागर गंगा ओघीं मिळे । आपणचि खेळे आपणाशीं ॥ १ ॥ मधील ते वाव अवघी उपाधि । तुम्हां आम्हां-मधीं तेचि परि ॥ २ ॥ घट मठ झाले आकाशाचे पोटीं । वचनेंचि तुटी तेथेंचि ते ॥ ३ ॥ तुका म्हणे बीजें बीज दाखविलें । + पत्र पुष्प आलें गेलें वायां ॥ ४ ॥

३७६९. दूरि तोंचि होतों आपुले आशंके । नव्हते ठाऊके मूळ भेद ॥ १ ॥ आतां जेथें तेथें येईन सांगातें । लपायापुरतें उरों नेदीं ॥ २ ॥ मिथ्या मोहें मज लाविला उशीर । तरी हें अंतर झालें होतें ॥ ३ ॥ तुका म्हणे कां रे दाखविसी भिन्न । लटिकाची शीण लपंडाई ॥ ४ ॥

* तेथें तेंचि. $ शीणचि. + फलपुष्प.

३७७०. लवण मेळवितां जळें। काय उरलें निराळें ॥ १ ॥ तैसा समरस झालों। तुजमाजी हरपलों ॥ २ ॥ अग्निकर्पूराच्या मेळीं। काय उरली काजळी ॥३॥ तुका म्हणे होती। तुझी माझी एक ज्योती ॥ ४ ॥

३७७१. तुज मज नाहीं भेद। केला सहज विनोद ॥ १ ॥ तूं माझा आकार। मी तों तूंची निर्धार ॥ २ ॥ मी तुजमाजी देवा। घेसी माझ्या अंगें सेवा ॥ ३ ॥ मी तुजमाजी अचळ। मजमाजी तुझें बळ ॥ ४ ॥ तूं बोलसी माझ्या मुखें। मी तो तुजमाजी सुखें ॥ ५ ॥ तुका म्हणे देवा। विपरीत ठायीं नांवा ॥ ६ ॥

३७७२. जें जें कांहीं करितों देवा। तें तें सेवा समर्पे ॥ १ ॥ भेद नाहीं सर्वात्मना। नारायणा तुज मज ॥ २ ॥ आम्ही दुजें नेणों कोणा। हेंचि मना मन साक्ष ॥ ३ ॥ तुका म्हणे जगन्नाथा। हें अन्यथा नव्हे कीं ॥ ४ ॥

३७७३. रज्जु धरूनियां हातीं। भेडसाविलीं नेणतीं। कळों येतां चित्तीं। दोरी दोघां सारिखी ॥ १ ॥ तुम्हांआम्हांमध्यें हरी। झाली होती तैसी परी। मृगजळाचे पुरीं। ठाव पाहों तरावया ॥ २ ॥ सरी चिताक भोंवरी। अळंकाराचिया परी। नामें झालीं दुरी। एक सोनें आटितां ॥ ३ ॥ पिसांचीं पारवीं। करोनि बाजेगिरी दावी। तुका म्हणे तेवीं। मज नको चाळवूं ॥ ४ ॥

३७७४. खडा रवाळी साकर। झाला नामाचाची फेर। न दिसे अंतर। गोडी ठायीं निवडतां ॥ १ ॥ तुम्ही आम्ही पांडुरंग। भिन्न ऐसें काय सांगा। चाळविलें जगा। मी हे माझें यासाठीं ॥२॥ पायीं हातीं नाकीं शिरीं। हेम राहे अळंकारीं। मुसे आल्यावरी। काय निवडे वेगळें ॥ ३ ॥ निजलिया लाभ हानी। तोंच खरी ते स्वप्नीं। तुका म्हणे दोन्ही। निवारलीं जागतां ॥ ४ ॥

३७७५. अस्त नाहीं आतां एकाचि मोहोरा। पासूनि अंधारा दुरी झालों ॥ १ ॥ साक्षत्वें या झालों गुणाचा देखणा। करी नारायणा तरी खरें ॥ २ ॥ आठवूं विसरु पडियेला मागें। आलें

तेचि भागें यत्न केले ॥ ३ ॥ तुका म्हणे माझा विनोद देवासीं । आम्ही तुम्हां ऐसीं दोन्ही नव्हों ॥ ४ ॥

३७७६. धन्य मी मानीन आपुलें संचित । राहिलींसे प्रीत तुझे नामीं ॥ १ ॥ धन्य झालों आतां यासि संदेह नाहीं । न पडे या वाहीं काळा हातीं ॥ २ ॥ ब्रह्मरस करूं भोजन पंगती । संतांचे संगती सर्वकाळ ॥३॥ तुका म्हणे पोट धालेंचि न धाय । खादलेंचि खाय आवडीनें ॥ ४ ॥

३७७७. कासयानें पूजा करूं केशीराजा । हाचि संदेह माझा फेडीं आतां ॥ १ ॥ उदकें न्हाणूं तरी स्वरूप तें तुझें । तेथें काय माझें वेचे देवा ॥ २ ॥ गंधाचा सुगंध पुष्पाचा परिमळ । तेथें मी दुर्बळ काय करूं ॥ ३ ॥ फळदाता तूंच तांबोल अक्षता । तेथें काय आतां वाहों तुज ॥ ४ ॥ वाहूं दक्षिणा तरी धातु नारायण । ब्रह्म तेंचि अन्न दुजें काई ॥ ५ ॥ गातां तूं ॐ कार टाळी नादेश्वर । नाचावया थार नाहीं कोठें ॥६॥ तुका म्हणे मज अवघें तुझें नाम । धूप दीप रामकृष्णहरि ॥ ७ ॥

३७७८. कवणाचें कारण नलगेचि कांहीं । सर्वीं सर्वांठायीं तूं मज एक ॥ १ ॥ कायावाचामन ठेविलें तुझ्या पायीं । आतां उरलें काई न दिसे देवा ॥ २ ॥ कवणा पाषाणासी धरूनियां भाव । कवणावरी पाव ठेवूं आतां ॥३॥ म्हणऊनि निश्चिंत राहिलों मनीं । तूंचि सर्वा खाणीं देखोनियां ॥ ४ ॥ जळे जळ काय धोविलें एक । कवण तें पातक हरलें तेथें ॥ ५ ॥ पापपुण्य हे वासना सकळ । ते तुज समूळ समर्पिली ॥ ६ ॥ पितरस्वरूपी तूंचि जनार्दन । सव्य तें कवण अपसव्य ॥७॥ तुका म्हणे जीत पिंड तुझे हातीं । देऊनि निश्चिंती मानियेली ॥ ८ ॥

३७७९. जन्ममरणाची विसरलों चिंता । तूं माझा अनंता मायबाप ॥ १ ॥ होतील ते डोळां पाहेन प्रकार । भय आणि भार निरसलीं ॥ २ ॥ लिगाडाचे मुळें होतीं पंचभूतें । ज्याचें त्यापुरतें विभागिलें ॥ ३ ॥ तुका म्हणे झाला प्रपंच पारिखा । जिवासी तूं सखा पांडुरंग ॥ ४ ॥

३७८०. वंदीन मी भूतें । आतां अवघींचि समस्तें ॥१॥ तुमची करीन भावना । पदोपदीं नारायणा ॥ २ ॥ गाळूनियां भेद । प्रमाण तो ऐसा वेद ॥ ३ ॥ तुका म्हणे मग । नव्हे दुजियाचा संग ॥ ४ ॥

३७८१. जेथें जेथें जासी । तेथें मजचि तूं पाहासी ॥१॥ ऐसा पसरीन भाव । रिता नाहीं कोणी ठाव ॥ २ ॥ चित्त जडलें पायीं । पाळती हें ठायीं ठायीं ॥३॥ तुका म्हणे पोटीं । देवा घालूनि सांगे गोष्टी ॥ ४ ॥

३७८२. आम्ही न देखों अवगुणां । पापी पवित्र शाहाणा ॥१॥ अवघीं रूपें तुझीं देवा । वंदूं भावें करूं सेवा ॥ २ ॥ मज भक्तीसवें चाड । नेणें पाषाण धातु वाड ॥३॥ तुका म्हणे घोटीं । विष अमृत तुजसाठीं ॥ ४ ॥

३७८३. तुज करितां होते ऐसे । मूढ चतुर पंडित पिसे ॥ १ ॥ परि हें वर्म नेणती कोणी । पीडा खाणी भोगितील ॥ २ ॥ उल्लंघिती पांगुळ गिरी । मुकें करी अनुवाद ॥ ३ ॥ पापी होती पुण्यवंत । न करी घात दुर्जन ॥ ४ ॥ अवघें हेळामात्रें हरि । मुक्त करी ब्रह्मांड ॥ ५ ॥ तुका म्हणे खेळे लीळा । पाहे वेगळा व्यापुनी ॥ ६ ॥

३७८४. कडसणी धरितां अडचणीचा ठाव । म्हणऊनि जीव त्रासलासे ॥१॥ लौकिकाबाहेरी राहिलों निराळा । तुजविण वेगळा नाहीं दुजा ॥ २ ॥ संकोचानें नाहीं होत धणीवरी । उरवूनि उरी काय काज ॥ ३ ॥ तुका म्हणे केलें इच्छेची सारिखें । नाहींसें पारिखें येथें कोणी ॥ ४ ॥

३७८५. अंतराये पडे गोविंदीं अंतर । जो जो घ्यावा भार तो तो बाधी ॥ १ ॥ बैसलिये ठायीं आठवीन पाय । पाहीन तो ठाय तुझा देवा ॥ २ ॥ अखंड तें खंडें संकल्पी विकल्प । मनोजन्य पाप रज्जुसर्प ॥ ३ ॥ तुका म्हणे विश्वीं विश्वंभर वसे । राहों ऐसे दशे सुखरूप ॥ ४ ॥

३७८६. माझिया देहाची मज नाहीं चाड। कोठें करूं कोड आणिकांचें ॥ १ ॥ इच्छितात मान मागा देवापाशीं। असा संचितासी गुंतले हो ॥२॥ देह आम्हीं केला भोगाचे सांभाळीं। राहिलों निराळीं मानामाना ॥ ३ ॥ तुका म्हणे कोणें वेचावें वचन। नसतां तो शीण वाढवावा ॥ ४ ॥

३७८७. बोळविला देह आपुलेनि हातें। हुताशिलीं भूतें ब्रह्माग्नीसीं ॥ १ ॥ एक वेळे झालें सकळ कारण। आतां नारायण नारायण ॥ २ ॥ अमृतसंजीवनी * विजात्रिली खाई। अंगें तये ठायीं हारपलीं ॥ ३ ॥ एकादशीविध जागरण उपवास। बारावा दिवस भोजनाचा ॥४॥ अवघीं कर्में झालीं घटस्फोटापाशीं। संबंध एकेसी उरला नामीं ॥५॥ तुका म्हणे आतां आनंदी आनंदु। गोविंदें गोविंदु विस्तारला ॥ ६ ॥

३७८८. नलगे मरावें। ऐसा ठाव दिला देवें ॥ १ ॥ माझ्या उपकारासाठीं। वागविला म्हूण कंठीं ॥ २ ॥ घरीं दिला ठाव। अवघा सकळही वाव ॥ ३ ॥ तुका म्हणे एके ठायीं। केलें माझें तुझें नाहीं ॥ ४ ॥

३७८९. एकाएकीं आतां असावेंसें वाटें। तरिच हे खोटे चाळे केले ॥ १ ॥ वाजवूनि तोंड घातलें बाहेरी। × कुल्प करुनी दारीं माजी वसा ॥ २ ॥ उजेडाचा केला दाटोनि अंधार। सवें हुद्देदार चेष्टविला ॥ ३ ॥ तुका म्हणे भय होतें तोंचि वरी। होती कांहीं उरी स्वामिसेवा ॥ ४ ॥

३७९०. सोसोनि विपत्ती। जोडी दिली तुझे हातीं ॥ १ ॥ त्याचा हाचि उपकार। अंतीं आम्हांशीं वेव्हार ॥ २ ॥ नामरूपा केला ठाव। तुज कोण म्हणते देव ॥ ३ ॥ तुका म्हणे हरी। तुज ठाव दिला घरीं ॥ ४ ॥

३७९१. जेथें देखें तेथें उभा। अवघ्या गगनाचा गाभा ॥ १ ॥ डोळां बैसलें बैसलें। ध्यान राहोनि संचलें ॥२॥ सरसावलें मन।

* निववली. × कल्पें.

केले सोज्वळ लोचन ॥ ३ ॥ तुका म्हणे सवें । आतां असिजेत देवें ॥ ४ ॥

३७९२. हेचि तुझी पूजा । आतां करीन केशीराजा ॥ १ ॥ अवघीं तुझींच हीं पदें । नमस्कारीन अभेदें ॥ २ ॥ न वर्जित दिशा । जाय तेथेंचि सरिसा ॥ ३ ॥ नव्हे एकदेशी । तुका म्हणे गुणदोषी ॥ ४ ॥

३७९३. वेठी ऐसा भाव । न करी आहाच उपाव ॥ १ ॥ रूप इसवीन जीवा । अवघा येच ठायीं हेवा ॥ २ ॥ कृपणाचे परी । लेखा पळनिमेषवरी ॥ ३ ॥ तुका म्हणे असा । संनिधचि जगदीशा ॥ ४ ॥

३७९४. नेलें सळेंबळें । चित्ताविताचे गांठोळें ॥ १ ॥ साह्य झालीं घरिच्या घरीं । होतां ठायींच कुठोरी ॥ २ ॥ मी पातलों या भावा । कपट तें नेणें देवा ॥ ३ ॥ तुका म्हणे उघडें केलें । माझें माझ्या हातें नेलें ॥ ४ ॥

३७९५. एक वेळे केलें रितें कलेवर । आतां दिली थार पांडुरंगा ॥ १ ॥ पाळण पोषण नलगे ते सोई । देहाचे ते काई सर्वभाव ॥ २ ॥ माझिया मरणें झाली हे वसती । लागली ते ज्योती अविनाश ॥ ३ ॥ झाला ऐसा एका घायें येथें नाहीं । तुका ऐसें कांहीं बोलों नये ॥ ४ ॥

३७९६. नटनाट्य तुम्हीं केलें याचसाठीं । कवतुकें दृष्टी निववावी ॥ १ ॥ नाहीं तरी काय कळलेंचि आहे । वाघ आणि गाय लाकडाची ॥२॥ अभेदचि असे मांडियेलें खेळा । केल्या दीपकळा बहु एकी ॥ ३ ॥ तुका म्हणे रूप नाहीं दर्पणांत । संतोषाची मात दुसरें तें ॥ ४ ॥

३७९७. मुसावलें अंग । रंगीं मेळविला रंग ॥ १ ॥ एकीं एक दृढ झालें । मुळा आपुलिया आलें ॥२॥ सागरीं थेंबुटा । पडिल्या निवडे कोण्या वाटा ॥ ३ ॥ तुका म्हणे नवें । नव्हे जाणावें हें देवें ॥ ४ ॥

३७९८. तुझे पाय माझे राहियेले चित्तीं । ते मज दाविती वर्म देवा ॥ १ ॥ आम्हां अंधा तुझ्या पायांचा आधार । जाणसी विचार चालवितां ॥ २ ॥ मन स्थिर ठेलें इंद्रियें निश्चळ । हें तों माझें बळ नव्हे देवा ॥ ३ ॥ पापपुण्य भेद नाशिलें तिमिर । त्रिगुणें शरीर सांडियेलें ॥४॥ तुका म्हणे तुझा प्रताप हा खरा । मी जाणे दातारा शरणागत ॥ ५ ॥

३७९९. जेथें जातों तेथें तूं माझा सांगाती । चालविसी हातीं धरूनियां ॥ १ ॥ चालों वाटे आम्ही तुझाचि आधार । चालविसी भार सवें माझा ॥ २ ॥ बोलों जातां बरळ करिसी ते नीट । नेली लाज धीट केलों देवा ॥ ३ ॥ अवघे जन मज झाले लोकपाळ । सोइरे सकळ प्राणसखे ॥ ४ ॥ तुका म्हणे आतां खेळतों कौतुकें । झालें तुझें सुख अंतर्बाही ॥ ५ ॥

३८००. रूपीं जडले लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥ १ ॥ देहभाव हरपला । तुज पाहातां विठ्ठला ॥२॥ कळों नये सुखदुःख । तहान हरपली भूक ॥ ३ ॥ तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥ ४ ॥

३८०१. तेव्हां होतों भोगाधीन । तुम्हां भिन्न पासुनी ॥ १ ॥ आतां बोलों नये ऐसें । आनारिसें वेगळें ॥ २ ॥ सन्मुख झालों स्वामीकडे । भव आंगडे निराळें ॥ ३ ॥ चिंतिलें तें चिंतामणी । फिटे धणी तों द्यावें ॥ ४ ॥ सहज स्थिति आहे अंगीं । प्रसंगीं तें वंचेना ॥ ५ ॥ तुमची देवा धरिली कास । केला नास प्रपंचा ॥६॥ तुका म्हणे जाणोनि वर्में । कर्माकर्में ठेविलीं ॥ ७ ॥

३८०२. देव सखा आतां केलें नव्हे काई । येणें सकळही सोइरींच ॥१॥ भाग्यवंत झालों गोतें सपुरतीं । आतां पुण्या नीति पार नाहीं ॥२॥ पाहातां दिसती भरलिया दिशा । उसावला ठसा लोकत्रयीं ॥ ३ ॥ अविनाश जोडी आम्हां भाग्यवंता । झाली होती सत्ता संचिताची ॥ ४ ॥ पायांवरी डोई ठेवाया आरोथा । झाली द्यावी सत्ता क्षेम ऐसी ॥ ५ ॥ तुका म्हणे जीव पावला विसावा । म्हणवितां देवा तुमचीसीं ॥ ६ ॥

३८०३. तेणें सुखें माझें निववीलें अंग। विठ्ठल हें जग देखियेलें ॥ १ ॥ कवतुकें करुणा भाकीतसे लाडें। आवडी बोवडें बोलोनियां ॥ २ ॥ मज नाहीं दशा अंतरीं दुःखाची। भावना भेदाची सर्व गेली ॥ ३ ॥ तुका म्हणे सुख झालें माझ्या जीवा। रंगलों केशवा तुझ्या रंगें ॥ ४ ॥

३८०४. दिला जीवभाव। तेव्हां सांडिला म्यां ठाव ॥ १ ॥ आतां वर्ते तुझी सत्ता। तेथें सकळ अनंता ॥ २ ॥ माझिया मरणें। तुम्हीं बैसविलें ठाणें ॥ ३ ॥ तुका म्हणे कांहीं। मी हें माझें येथें नाहीं ॥ ४ ॥

३८०५. आपुलिया काजा। आम्हीं सांडियेलें लाजा ॥ १ ॥ तुम्हां असों जागवीत। आपुलिया हातीं हित ॥ २ ॥ तुम्हीं देहशून्य। आम्हां कळे पापपुण्य ॥ ३ ॥ सांगायासी लोकां। उरउरीत उरला तुका ॥ ४ ॥

३८०६. पदोपदीं दिलें अंग। झालें सांग कारण ॥ १ ॥ रुधवूनि ठेलों ठाव। जागा वाव सकळ ॥ २ ॥ पुढती चाली मना लाहो। वाढे देहो संतोष ॥३॥ तुका म्हणे क्षरभागीं। झालों जगीं व्यापक ॥ ४ ॥

३८०७. तुझें अंगभूत। आम्ही जाणतों समस्त ॥ १ ॥ येरा वाटतसे जना। गुढारसें नारायणा ॥ २ ॥ ठावा थारा भारा। घरचिया संवचोरा ॥ ३ ॥ तुका म्हणे भेदाभेद। करूनि करितसें वाद ॥ ४ ॥

३८०८. नाहीं मज कोणी उरला दुर्जन। मायबापाविण ब्रह्मांडांत ॥ १ ॥ कासया जिकीर करणें येविसीं। भयाची मानसीं चिंता खंती ॥ २ ॥ विश्वंभराचिये लागलों सांभाळी। सत्तेनें ती चाली आपुलेये ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें पाळण पोषण। करितां आपण पांडुरंगा ॥ ४ ॥

३८०९. *जो वितो तो माझा पिता। उखता तो उखत्याचा ॥१॥

---

* जीविता तो.

जनार्दनीं सरती कर्में । बाधा भ्रमे अन्यत्र ॥ २ ॥ अपसव्य सव्यामधीं । ऐसी शुद्धी न धरितां ॥ ३ ॥ तुका म्हणे खांद्या पानें । सिंचितां भिन्न कोरडीं ॥ ४ ॥

३८१०. चित्ताचा चाळक । त्याचें उभय सूत्र एक ॥ १ ॥ नाचवितो नाचेछंदें । सुखें आपुल्या विनोदें ॥ २ ॥ चंद्र कमळणी । नाहीं धाडीत सांगोनी ॥ ३ ॥ तुका म्हणे उठी । लोह चुंबकाचे दृष्टी ॥ ४ ॥

३८११. काय नाहीं माझे अंतरीं वसति । व्यापक हा भूतीं सकळां नांदे ॥ १ ॥ चित्तासी प्रसाद होईल चळण । तेंचि तें वळण मनासही ॥ २ ॥ सर्व शक्ति जीवीं राहिल्या कुंठित । नाहीं केलें होत आपुलें तें ॥ ३ ॥ तुका म्हणे दोरी खांब सूत्र्या हातीं । नाचवी नाचती जडें तैसीं ॥ ४ ॥

३८१२. चित्त तें चिंतन कल्पनेची धांव । जे जे वाढे हांव इंद्रियांची ॥ १ ॥ हात पाव दिसे शरीर चालतां । नांवें भेद सत्ता जीवाची ते ॥ २ ॥ रवीचिये अंगीं प्रकाश सकळां । वचनें निराळा भेद दिला ॥ ३ ॥ तुका म्हणे माप वचनाच्या अंगीं । मौन्य काय रंगीं निवडावें ॥ ४ ॥

३८१३. परिसाचे अंगें सोनें झाला विळा । वाकणिया कळाहीन नव्हे ॥ १ ॥ अंतरीं पालट घडला कारण । मग समाधान तेंचि गोड ॥ २ ॥ पिकलिया सेंद पूर्वकर्मा नये । अव्हेरु तो काय घडे मग ॥ ३ ॥ तुका म्हणे आणा पंगती सुरण । पृथक ते गुण केले पाकें ॥ ४ ॥

३८१४. शुद्धाशुद्ध निवडे कैसें । चर्म मांस भिन्न नाहीं ॥ १ ॥ कांहीं आधिक नाहीं उणें । कवण्या गुणें देवासी ॥ २ ॥ उदक भिन्न असे काई । वोहोळ बावी सरिता नई ॥ ३ ॥ सूर्य तेजें निवडे काय । रश्मी रसा सकळा खाय ॥ ४ ॥ वर्णा भिन्न दुधा नाहीं । सकळां गाई सारखें ॥ ५ ॥ कारितां भिन्न नाहीं माती । मडक्या गाति भिन्न नांवें ॥ ६ ॥ वर्ते एकविध अग्नि । नाहीं मनीं शुद्धाशुद्ध ॥ ७ ॥ तुका म्हणे पात्र चाड । किंवा विष अमृत गोड ॥ ८ ॥

३८१५. घालूनियां मापीं । देव भक्त बैसले जपीं ॥ १ ॥ तैसी होते सांडउलंडी । निजनिजांची मुकंडी ॥ २ ॥ अमुपीं उखतें । आपण वोस आपणयातें ॥ ३ ॥ देव आतां झाला । उगवी संकोच वहिला ॥ ४ ॥ अखंड नेलें वेठी । भार सत्याविण गांठी ॥ ५ ॥ आडकिला झोंपा । रिता कलेवराचा खोंपा ॥ ६ ॥ गोदातीरीं आड । करिते करविते द्वाड ॥ ७ ॥ तुका म्हणे बळें । उपदेशाचें तोंड काळें ॥ ८ ॥

३८१६. ब्रह्मरूपाचीं कर्में ब्रह्मरूप । विरहित संकल्प होती जाती ॥ १ ॥ ठेविलिया दिसे रंगाऐसी शिळा । उपाधि निराळा स्फटिक मणि ॥ २ ॥ नानाभाषामतें आळवितां बाळा । प्रबोध तो मूळा जननीठायीं ॥ ३ ॥ तुका म्हणे माझें नमन जाणतियां । लागतसें पायां वेळोवेळां ॥ ४ ॥

३८१७. स्वयें पाक करी । संशय तोचि धरी । संदेहसागरीं । आणिकां परी बुडविती ॥ १ ॥ जाणे विरळा एक । झालें तेथेंचि हें सुख । देखिलें बहुतेक । पुसतां वाट चुकले ॥ २ ॥ तोचि जाणे सोंवळें । शोधी विकल्पाचीं मुळें । नाचती पाल्हाळें । जे विटाळें कोंडिले ॥ ३ ॥ तोचि साधी संधी । सावध त्रिकाळ जो बुद्धि । संदेहाच्या संधी । वेठी आणीक धरियेले ॥ ४ ॥ अखंड तें ध्यान । समबुद्धि समाधान । सोंग वायांविण । ते झांकून बैसती ॥ ५ ॥ करणें जयासाठीं । जो नातुडे कवणे आटी । तुका म्हणे साटी । चित्तावित्तेंवांचूनि ॥ ६ ॥

३८१८. प्रसिद्ध हा असे जगा । अवघ्या रंगारंगाचा ॥ १ ॥ तरी वाटा न वजे कोणी । नारायणीं घुरबुडीं ॥ २ ॥ बहुतां ऐसें केलें मागें । लाग लागें लागेना ॥ ३ ॥ हो कां नर अथवा नारी । लहान थोरीं आदर ॥ ४ ॥ झालें वेगळें लोकीं पुरे । मग नुरे समूळ ॥ ५ ॥ कळेना तो आहे कैसा । कोणी दिशा बहु थोडा॥६॥ तुका म्हणे दुसऱ्या भावें । छाया नावें न देखवे ॥ ७ ॥

३८१९. नाहीं रूप नाहीं नांव । नाहीं ठाव धराया ॥ १ ॥

जेथें जावें तेथें आहे। विठ्ठल मायबहीण ॥ २ ॥ नाहीं आकार विकार। चराचर भरलेंसे ॥ ३ ॥ नव्हे निर्गुण सगुण। जाणे कोण तयासी ॥ ४ ॥ तुका म्हणे भावाविण। त्याचें मन बोळेना ॥ ५ ॥

३८२०. अनुसरे तो अमर झाला। अंतरला संसारा ॥ १ ॥ न देखती गर्भवास। कधीं दास विष्णूचे ॥ २ ॥ विसंबेना माता बाळा। तैसा लळा पाळावा ॥ ३ ॥ त्रिभुवनीं ज्याची सत्ता। *तो राक्षिता जालिया ॥ ४ ॥

३८२१. पंडित तोचि एक भला। नित्य भजे जो विठ्ठला ॥१॥ अवघें सम ब्रह्म पाहे। सर्वां भूतीं विठ्ठल आहे ॥ २ ॥ रिता नाहीं कोणी ठाव। सर्वां भूतीं वासुदेव ॥ ३ ॥ तुका म्हणे तोचि दास। त्या देखिल्या जाती दोष ॥ ४ ॥

३८२२. देवें देऊळ सोविलें। उदक कोरडेंचि ठेविलें ॥ १ ॥ नव्हे मत गूढ उमान कांहीं। तूं आपआपणापें पाहीं ॥ २ ॥ पाटें पूर बोसंडला। सरिता सागर तुंबोनि ठेला ॥ ३ ॥ वांझे घरीं बाळ तान्हा। एक बाळी दो कानां ॥ ४ ॥ तुका म्हणे पैस। अनुभविया ठावा गोडी रस ॥ ५ ॥

३८२३. सर्वस्वाचा त्याग तो सदा सोंवळा। न लिंपे विटाळा अग्नि जैसा ॥ १ ॥ सत्यवादी करी संसार सकळ। अलिप्त कमळ जळीं जैसें ॥ २ ॥ घडे ज्या उपकार भूतांची ते दया। आत्मस्थिति तया अंगीं वसे ॥ ३ ॥ न बोले गुणदोष नाइके जो कानीं। वर्तोनी तो जनीं जनार्दन ॥ ४ ॥ तुका म्हणे वर्म जाणितल्याविण। पावे करितां शीण सांडीमांडी ॥ ५ ॥

३८२४. आहे सकळां वेगळा। खेळे कळा चोरोनि ॥ १ ॥ खांबसूत्राचिये परी। देव दोरी हालवितो ॥ २ ॥ आपण राहोनि निराळा। कैसी कळा नाचवी ॥ ३ ॥ जेव्हां असुडितो दोरी। भूमीवरी पडे तेव्हां ॥ ४ ॥ तुका म्हणे तो जाणावा। सखा करावा आपला ॥ ५ ॥

---

* तुक्या राक्षिता तो जाला

३८२५. संवसार तिहीं केला पाठमोरा। नाहीं द्रव्यदारा जया चित्तीं ॥ १ ॥ शुभाशुभ नाहीं हर्षामर्ष अंगीं। जनार्दन जगीं होउनि ठेला ॥ २ ॥ तुका म्हणे देह दिला एकसरें। जयासी दुसरें नाहीं मग ॥ ३ ॥

३८२६. भक्तीचें तें वर्म जयाचिये हातीं। तया घरीं शांति क्षमा दया ॥ १ ॥ अष्ट महा सिद्धि वोळगती द्वारीं। नवजती दूरी दवडितां ॥ २ ॥ तेथें दुष्ट गुण न मिळे निःशेष। चैतन्याचा वास झाला माजी ॥ ३ ॥ संतुष्ट हें चित्त सदा सर्वकाळ। तुटली हळहळ त्रिगुणाची ॥ ४ ॥ तुका म्हणे त्याचा देव सर्व भार। चालवी कामार होउनीयां ॥ ५ ॥

३८२७. देव तिहीं बळें धरिला सायासें। करूनियां नास उपाधीचा ॥ १ ॥ पूर्वपक्षी धातु धिक्कारिलें जन। स्वयें जनार्दन तेचि झाले ॥ २ ॥ तुका म्हणे यासी न चले तांतडी। अनुभवें गोडी येइल कळों ॥ ३ ॥

३८२८. मुक्त तो आशंका नाहीं जया अंगीं। बद्ध मोहोसंगीं लज्जा चिंता ॥ १ ॥ सुख पावे शांती धरूनि एकान्त। दुःखी तो लोकांत दंभ करी ॥ २ ॥ तुका म्हणे लागे थोडाच विचार। परी हे प्रकार नागविती ॥ ३ ॥

३८२९. भूतांचिये नांदे जीवीं। गोसावीच सकळां ॥ १ ॥ क्षणक्षणां जागा ठायीं। दृढ पायीं विश्वास ॥ २ ॥ दावूनियां सोंग दुजें। अंतर बीजें वसतसे ॥ ३ ॥ तुका म्हणे जाणें धर्म। धरी तें वर्म चिंतन ॥ ४ ॥

३८३०. अग्नीमाजी पडे धातु। लीन होउनि राहे आंतु। होय शुद्ध न पावे धातु। पटतंतुप्रमाणें ॥ १ ॥ वाह्यरंगाचें कारण। मिथ्या अवघेंचि भूषण। गर्व ताठा हें अज्ञान। मरण सवें वाहातसे ॥ २ ॥ पुरें मातालिया नदी। लव्हाळा नांदे जीवनसंधी। वृक्ष उन्मळोनि भेदी। परि तो कधीं भंगेना ॥ ३ ॥ हस्ती परदळ जो भंगी। तया पायीं न मरे मुंगी। कोण जाय संगीं। पाणोवाणी

तयाच्या ॥ ४ ॥ पिटितां घणें वरि सैरा । पोटीं राहे हिरा । तैशा काय तगती गारा । तया थोरा होऊनि ॥ ५ ॥ लीन दीन हेंचि सार । भव उतरावया पार । बुडे माथां भार । तुका म्हणे वाहोनि ॥ ६ ॥

३८३१. योग्याची संपदा त्याग आणि शांति । उभयलोकीं कीर्ति सोहळा मान ॥ १ ॥ येरयेरांवरी जायांचें उसणें । भाग्यस्थळीं देणें झाडा वेसीं ॥ २ ॥ केलीया फावला ठायींचा तो लाहो । तृष्णेचा तो काहो काहावितो ॥ ३ ॥ तुका म्हणे लाभ अकर्तव्या नांवें । शिवपद जीवें भोगिजेल ॥ ४ ॥

३८३२. ओनाम्याच्या काळें । खडे मांडविले बाळें ॥ १ ॥ तेंचि पुढें पुढें काई । मग लागलिया सोई ॥ २ ॥ रज्जु सर्प होता । तोंवरी न कळतां ॥ ३ ॥ तुका म्हणे साचें । भय नाहीं बागुलाचें ॥ ४ ॥

३८३३. आहे तें सकळ कृष्णासी अर्पण । न कळतां मन दुजें भावी ॥ १ ॥ म्हणउनी पाठी लागतील भुतें । येती गिवसीत पांचजणें ॥ २ ॥ ज्याचें त्या वंचलें आठव न होतां । दंड या निमित्ताकारणें हा ॥ ३ ॥ तुका म्हणे काळें चेपियेला गळा । मी मी वेळोवेळां करीतसे ॥ ४ ॥

३८३४. देवाच्या उद्देशें जेथें जेथें भाव । तो तो वसे ठाव विश्वंभर ॥ १ ॥ लोभाचे संकल्प पळालियावरी । कैंची तेथें उरी पापपुण्या ॥ २ ॥ शुद्ध भक्ती मन झालिया निर्मळ । कुश्चळीं विटाळ वज्रलेप ॥ ३ ॥ तुका म्हणे ज्याचें तयासीच कळे । प्रांत येतो फळें कळों मग ॥ ४ ॥

३८३५. चित्त ग्वाही तेथें लौकिकाचें काई । स्वहित तें ठायीं आपणापें ॥ १ ॥ मनासी विचार तोचि साच भाव । व्यापक हा देव अंतर्बाहीं ॥ २ ॥ शुद्ध भावा न लगे सुचावा परिहार । उमटे साचार आणिके ठायीं ॥ ३ ॥ भोगित्यासी काज अंतरींचें गोड ।

बाहिरल्या चाड नाहीं रंगें ॥ ४ ॥ तुका म्हणे भाव शुद्ध हें कारण। भाट नारायण होईल त्याचा ॥ ५ ॥

३८३६. कुशळ वक्ता नव्हे जाणीव तो श्रोता । राहे भाव चित्ता धरोनियां ॥ १ ॥ धन्य तो जगीं धन्य तो जगीं । ब्रह्म तया अंगीं वसतसे ॥ २ ॥ न धोवी तोंड न करी अंघोळी । जपे सदाकाळीं रामराम ॥ ३ ॥ जप तप ध्यान नेणे योग युक्ती । कृपाळु जो भूतीं दयावंत ॥ ४ ॥ तुका म्हणे होय जाणोनि नेणता । आवडे अनंता जीवाहूनि ॥ ५ ॥

३८३७. भूमि अवघी शुद्ध जाणा । अमंगळ हे वासना ॥ १ ॥ तैसे वोसपले जीव । सांडी नसतां अंगीं घाव ॥ २ ॥ जीव अवघे देव । खोटा नागवी संदेह ॥ ३ ॥ तुका म्हणे शुद्ध । मग तुटालिया भेद ॥ ४ ॥

३८३८. निघालें दिवाळें । झालें देवाचें वाटोळें ॥ १ ॥ आतां वेचूं नये वाणी । विचारावें मनिंच्या मनीं ॥२॥ गुंडाळिलीं पोतीं । भीतरीं लावियेली वाती ॥ ३ ॥ तुका म्हणे करा । ऐसा राहे माजी घरा ॥ ४ ॥

३८३९. भूतीं भगवद्भाव । मात्रासहित जीव । अद्वैत तो ठाव । निरंजन एकला ॥ १ ॥ ऐसीं गर्जती पुराणें । वेदवाणी सकळ जन । संत गर्जतील तेणें । अनुभवें निर्भर ॥ २ ॥ माझें तुझें हा विकार । निरसतां एकंकार । नलगे कांहीं फार । विचाराचि करणें ॥ ३ ॥ तुका म्हणे दुजें । हें तों नाहींच सहजें । संकल्पाच्या काजें । आपेंआप वाढलें ॥ ४ ॥

३८४०. मुक्त होता परि बळें झाला बद्ध । घेऊनियां छंद माझें माझें ॥ १ ॥ पाप पुण्य अंगीं घेतलें जडून । वर्म नेणें कोण करिता तो ॥ २ ॥ तुका म्हणे गेलें व्यर्थ वायांविण । जैसा मृग शीण मृगजळीं ॥ ३ ॥

३८४१. प्रगटलें ज्ञान । नारायण भूतीं तें ॥ १ ॥ अनुभवाचि घेऊं हावा । विनंती देवा करूनियां ॥ २ ॥ देखोवेखीं वदे वाणी ।

पडिल्या कानीं प्रमाण ॥ ३ ॥ तुका म्हणे योगक्षेम । घडे तें वर्म साधावें ॥ ४ ॥

३८४२. × देव आहे सुकाळ देशीं । अभाग्यासी दुर्भिक्ष ॥ १ ॥ नेणती हा करूं सांटा । भरले फांटा आडरानें ॥ २ ॥ वसवूनि असे घर । माग दूर घातला ॥ ३ ॥ तुका म्हणे मन मुरे । मग जें उरे तेंचि तूं ॥ ४ ॥

३८४३. आहे ऐसा देव वदवावी वाणी । नाहीं ऐसा मनीं अनुभवावा ॥ १ ॥ आवडी आवडी कलेवरा कलेवरीं । वरिलें अंतरीं ताळा पडे ॥ २ ॥ अपूर्व दर्शन मातेपुत्रा भेटी । रडे मागे तुटी हर्षयोगें ॥ ३ ॥ तुका म्हणे एकें कळतें दुसरें । बरियानें बरें आहाचें आहाच ॥ ४ ॥

३८४४. होईल झाला अंगें देव जो आपण । तयासी हे जन अवघे देव ॥ १ ॥ येरांनीं सांगावी रेमट काहाणी । चित्ता रंजवणी करावया ॥ २ ॥ धाला आणिकांची नेणे तहानभूक । सुखें पाहे सुख आपुलिया ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें पाहिजे अनुभव । शब्दांचें गौरव कामा नये ॥ ४ ॥

३८४५. तेंही नव्हे जें करितां कांहीं । ध्याता ध्यायी तेंही नव्हे ॥ १ ॥ तेंही नव्हे जें जाणवी जना । वाटे मना तेंही नव्हे ॥ २ ॥ त्रास मानिजे कांटाळा । अशुभ वाचाळा तेंही नव्हे ॥ ३ ॥ तेंही नव्हे जें भोंवतीं भोंवे । नागवें धांवे तेंही नव्हे ॥ ४ ॥ तुका म्हणे एकचि आहे । सहजीं पाहें सहज ॥ ५ ॥

३८४६. पहिली माझी ओवी ओवीन जगत्र । गाईन पवित्र पांडुरंग ॥ १ ॥ दुसरी माझी ओवी दुजें नाहीं कोठें । जनीं वनीं भेटे पांडुरंग ॥ २ ॥ तिसरी माझी ओवी तिला नाहीं ठाव । अवघाचि देव जनीं वनीं ॥ ३ ॥ चवथी माझी ओवी वैरिलें दळण । गाईन निधान पांडुरंग ॥ ४ ॥ पांचवी माझी ओवी माझिया माहेरा । गाईन निरंतरा पांडुरंगा ॥ ५ ॥ साहावी माझी ओवी साहाही

× देह.

आटली । गुरुमूर्ति भेटली पांडुरंग ॥ ६ ॥ सातवी माझी ओवी आठवी वेळोवेळां । बैसलासे डोळां पांडुरंग ॥७॥ आठवी माझी ओवी अठ्ठावीस युगें । उभा चंद्रभागे पांडुरंग ॥ ८ ॥ नववी माझी ओवी सरलें दळण । चुकलें मरण संसारींचें ॥ ९ ॥ दहावी माझी ओवी दाहा अवतारा । न यावें संसारा तुका म्हणे ॥ १० ॥

३८४७. क्षणक्षणां सांभाळितों । साक्षी होतों आपुला ॥ १ ॥ न घडवी पायीं तुटी । मनें मिठी घातली ॥ २ ॥ विचार तो वचना आधीं । धरुनी शुद्धी ठेविली ॥ ३ ॥ तुका म्हणे मागें भ्यालों । तरी झालों जागृत ॥ ४ ॥

३८४८. भक्ति तें नमन वैराग्य तो त्याग । ज्ञान ब्रह्मीं भोग ब्रह्मतनु ॥ १ ॥ देहाच्या निरसनें पाविजे या ठाया । माझी ऐसी काया जंव नव्हे ॥ २ ॥ उदक अग्नि धान्य झाल्या घडे पाक । एकाविण एक कामा नये ॥३॥ तुका म्हणे मज कळते चांचणी । बडबडीची वाणी अथवा सत्य ॥ ४ ॥

३८४९. देखीचा दिमाख शिकोनियां दावी । हिऱ्याऐसी केवीं गारगोटी ॥ १ ॥ मर्यादा ते जाणे अरे अभागिया । देवाच्या ऐसिया सकळ मूर्ति ॥ २ ॥ काय पडिलासी लटिक्याचे भरी । वोंवाळुनी थोरी परती सांडी ॥ ३ ॥ तुका म्हणे पुढें दिसतसे घात । करितों फजित म्हणऊनी ॥ ४ ॥

३८५०. आधीं सोज्वळ करावा मारग । चालतां ते मग गोवी नाहीं ॥ १ ॥ ऐसा चालोनियां आला शिष्टाचार । गोवीचा वेव्हार पापपुण्य ॥२॥ पळणें ते पळा सांडूनि कां बळें । उपाधीच्या मुळें लाग पावे ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें शूर तो निवडे । पडिले बापुडे काळचक्रीं ॥ ४ ॥

३८५१. एकाविध नारायण । तेथें विषमाचा शीण । पालटोंचि भिन्न । नये अणुप्रमाण ॥ १ ॥ अवघें सारावें गाबाळ । चुकवूनियां कोल्हाळ । आनंदाचें स्थळ । एकाएकीं एकान्त ॥२॥ कायावाचामन । स्वरूपींच अनुसंधान । लक्ष भेदी बाण । येणेंपाडें लवलाहो ॥ ३ ॥

तुका म्हणे आळस निद्रा । येथें देऊनियां चिरा । देऊनियां धीरा । मिठी जाणा जागृती ॥ ४ ॥

३८५२. शुद्ध ऐसें ब्रह्मज्ञान । करा मन सादर ॥ १ ॥ रवि रसां सकळा शोषी । गुणदोषी न लिंपे ॥ २ ॥ कोणासवें नाहीं चोरी । सकळांवरी समत्व ॥ ३ ॥ सत्य तरी ऐसें आहे । तुका पाहे उपदेशीं ॥ ४ ॥

३८५३. जें जें जेथें पावे । तें तें समर्पावें सेवे ॥ १ ॥ सहज पूजा याचि नांवें । गळित अभिमान व्हावें ॥ २ ॥ अवघें भोगिता गोसावी । आदीं अवसानीं जीवीं ॥ ३ ॥ तुका म्हणे शीण । न धरितां नव्हे भिन्न ॥ ४ ॥

३८५४. अक्षरांचा श्रम केला । फळा आला तेणें तो ॥ १ ॥ अवधियाचा तळ धरी । जीवा उरी नुरवुनी ॥ २ ॥ फळलें तें लवे भारें । पिक खरें आलें तईं ॥ ३ ॥ तुका म्हणे हा गे देव । पुढें भाव सारावा ॥ ४ ॥

३८५५. संदेह बाधक आपआपणातें । रज्जुसर्पवत भासतसे ॥ भेऊनियां काय देखिलें येणें । मारें घायेंविण लोळतसे ॥ १ ॥ आपणचि तारी आपणचि मारी । आपण उद्धरी आपणयां ॥ शुकनळिकेन्यायें गुंतलासी काय । विचारूनि पाहें मोकळिया ॥२॥ पापपुण्य कैसे भांजिले अंक । दशकाचा एक उरविला ॥ जाणोनियां काय होतोसी नेणता । शून्या ठाव रिता नाहीं नाहीं ॥ ३ ॥ दुरा दृष्टी पाहें न्याहाळूनि । मृगजळा पाणी न म्हणे चाडा ॥ धांवतांचि फुटे नव्हे समाधान । तुका म्हणे जाण पावे पीडा ॥ ४ ॥

३८५६. आशा ते करविते बुद्धीचा तो लोप । संदेह तें पाप कैसें नव्हे ॥ १ ॥ आपुला आपण करावा विचार । प्रसन्न तें सार मन ग्वाही ॥२॥ नांवें रूपें अंगीं लाविला विटाळ । ह्यातें तें निर्मळ शुद्ध बुद्ध ॥ ३ ॥ अंधळ्यासी नये देखण्याची चाली । चाले ऐसी बोली तुका बोले ॥ ४ ॥

३८५७. साहोनियां टोले उरवावें सार । मग अंगीकार खऱ्या

मोलें ॥ १ ॥ भोगाचे सांभाळीं द्यावें कलेवर । संचिताची थार मोडूनियां ॥ २ ॥ महत्त्वाचे ठायीं भोगावी अप्रतिष्ठा । विटवावें नष्टा पंचभूतां ॥ ३ ॥ तुका म्हणे मग कैंचा संवसार । जयाचा आदर तेंचि व्हावें ॥ ४ ॥

३८५८. भोग भोगावरी द्यावा । संचिताचा करुनी ठेवा ॥१॥ शांती धरणें जिवासाटीं । दशा उत्तम गोमटी ॥ २ ॥ देह लेखावा असार । सत्य परउपकार ॥ ३ ॥ तुका म्हणे हे मिरासी । बुडी द्यावी ब्रह्मरसीं ॥ ४ ॥

३८५९. नटनाट्य अवघें संपादिलें सोंग । भेद दाऊं रंग न पालटे ॥ १ ॥ मांडियेला खेळ कौतुकें बहुरूप । आपलें स्वरूप जाणतसों ॥ २ ॥ स्फटिकाची शिळा उपाधि न मिळे । भाव दावी पिंवळे लाल संगें ॥ ३ ॥ तुका म्हणे आम्ही या जनाविरहित । होउनी निश्चित क्रीडा करूं ॥ ४ ॥

३८६०. काय नव्हेसी तूं एक । देखों कासया पृथक ॥ १ ॥ मुंग्या कैंचे मुंगळे । नटनाट्य तुझे चाळे ॥२॥ जाली तरी मर्यादा । किंवा त्रासावें गोविंदा ॥ ३ ॥ तुका म्हणे साचा । कोठें जासी हृदयींचा ॥ ४ ॥

३८६१. मज पाहातां हें लटिकें सकळ । कोठें मायाजाळ दावीं देवा ॥ १ ॥ कोणाचा कोणासीं न धरें संबंध । आहे शुद्धबुद्ध ठायींचे ठायीं ॥२॥ काढा जी आपुलें मोह बुंथी जाळें । नका लावूं बळें वेड आम्हां ॥ ३ ॥ जीव शिव काहीं ठेवियेलीं नांवें । सत्य तुम्हां ठावें असोनियां ॥ ४ ॥ सेवेच्या अभिळासें न धराचि विचार । आम्हां दारोदार हिंडविलें ॥ ५ ॥ आहे तैसें आतां कळ-लियावरी । परतें सांडा दूरी दुजेपण ॥ ६ ॥ तुका म्हणे काय छायेच्या अभिळासें । हंस पावे नाश तारांगणीं ॥ ७ ॥

३८६२. आपुलें आपण जाणावें स्वहित । जेणें राहे चित्त समाधान ॥ १ ॥ बहुरंगें माया असे विखुरली । कुंठितचि चाली होतां बरी ॥ २ ॥ पूजा ते अबोला चित्ताच्या प्रकारीं । भाव

विश्वंभरीं समर्पावा ॥ ३ ॥ तुका म्हणे गेला फिटोनियां भेव । मग होतो देव मनाच.चि ॥ ४ ॥

३८६३. चंचळीं चंचळ निश्चळीं निश्चळ । वाजवी खळाळ उदकासी ॥ १ ॥ सोपें वर्म परि मन नाहीं हातीं । हा हा भूत चित्तीं भ्रम गाढा ॥ २ ॥ रविबिंब नाहीं तुटत उदका । छायेची ते नका सरी धरूं ॥३॥ तुका म्हणे भय धरी रज्जूसाठीं । नाहीं साच पोटीं कळलें तों ॥ ४ ॥

३८६४. दुजें खंडें तरी । उरला तो अवघा हरि । आपणाबाहेरी । न लगे ठाव धुंडावा ॥१॥ इतुलें जाणावया जाणा । कोड तरी मनें मना । पारधीच्या खुणा । जाणतेणेचि साधाव्या ॥ २ ॥ देह आधीं काय खरा । देहसंबंधपसारा । बुजगावणें चोरा । रक्षणसें भासतें ॥ ३ ॥ तुका करी जागा । नको वासपूं वाउगा । आहेसि तूं अंगा । अंगीं डोळे उघडी ॥ ४ ॥

३८६५. मृगजळा काय करावा उतार । पावावया पार पैलथडी ॥ १ ॥ खापराचे होन खेळती लेंकुरें । काय त्या वेव्हारें लाभ हानी ॥ २ ॥ मंगळदायकें करिती कुमारी । काय त्यांची खरी सोयरीक ॥ ३ ॥ स्वप्नींचें जें सुख दुःख झालें कांहीं । जागृतीं तो नाहीं साच भाव ॥ ४ ॥ सारी झाली मेली लटिकें वचन । बद्ध मुक्त शीण तुका म्हणे ॥ ५ ॥

३८६६. माया तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि माया । अंग आणि छाया जयापरी ॥ १ ॥ तोडितां न तुटे सारितां निराळी । लोटांगणतळीं हारपती ॥२॥ दुजें नाहीं तेथें बळ कोणासाठीं । आणीक ते आटी विचाराची ॥ ३ ॥ तुका म्हणे उंच वाढे उंचपणें । ठेंगणीं लवणें जैसीं तैसीं ॥ ४ ॥

३८६७. सहज पावतां भगवंतीं । परि हीं विकल्पें परतीं । फुकाची हे चित्तीं । आठवण न धरिती ॥ १ ॥ हरि व्यापक सर्वगत । हा तंव मुख्यत्वें वेदान्त । चिंतनासी चित्त । असो द्यावें सावध ॥ २ ॥ विरजाहोम याचि नांवें । देह नव्हे मी हें जाणावें । मग

कां जी यावें । वरी लागे संकल्पा ।। ३ ।। कामक्रोधें देह मळिण । स्वाहाकारीं कैंचें पुण्य । मंत्रीं पूजिलिया यज्ञानें । मुंडण नव्हेचि ।। ४ ।। अनन्यभक्तीचे उपाय । त या विठोबाचे पाय । ध्याईल तो काय । चुकों जाणें मारग ।। ५ ।। आतां सांगे तुका । एक तुम्ही चुकों नका । सांडीमांडी धोका । शरण रिघतां गोमटें ।। ६ ।।

३८६८. हेचि याच्या ऐसें मागावें दान । वंदूनि चरण नारायणा ।। १ ।। धीर उदारींव निर्मळ निर्मत्सर । येणें सर्वेश्वर ऐसें नांव ।।२।। हाचि होईजेल याचिया विभागें । अनुभव अंगें अनुभवील्या ।। ३ ।। जोडे तयाचे कां न करावे सायास । झाला तरि आळस दीनपणें ।। ४ ।। फांवल्या मागें कां न घलावीं धांव । धरिल्या तरि हांव बळ येतें ।। ५ ।। तुका म्हणे घालूं खंडीमध्यें टांक । देवाचें हें एक करूनी घेऊं ।। ६ ।।

३८६९. इच्छा चाड नाहीं । न धरी संकोचही कांहीं ।। १ ।। उदका नेलें तिकडे जावें । केलें तैसें सहज व्हावें ।। २ ।। मोहरी कांदा ऊंस । एक वाफा भिन्न रस ।। ३ ।। तुका म्हणे सुख । पीडा इच्छा पावे दुःख ।। ४ ।।

३८७०. सर्वस्वाची साटी । तरिच देवासवें गांठी ।। १ ।। नाहीं तरी जया तैसा । भोग भोगवील इच्छा ।।२।। द्यावें तेंचि घ्यावें । म्हणऊनि ज्यावें जीवें ।। ३ ।। तुका म्हणे उरी । मागें नुरवितां बरी ।। ४ ।।

३८७१. अमर आहां अमर आहां । खरें कीं पहा खोटें हें ।।१।। न म्हणा देह माझा ऐसा । मग भरंवसा कळेल ।। २ ।। कैंचा धाक कैंचा धाक । सकाळिक हें आपुलें ।। ३ ।। देवचि बरे देवचि बरे । तुका म्हणे खरे तुम्ही ।। ४ ।।

३८७२. सरतें माझें तुझें । तरि हें उतरतें ओझें ।। १ ।। नलगे सांडावें मांडावें । आहे शुद्धचि स्वभावें ।। २ ।। घातला तो आशा । मोहोजाळें गळां फासा ।। ३ ।। सुखाचा तो मान । नाहीं दुःखाचा तो शीण ।। ४ ।। करिता नारायण । एवढें वेचितां वचन ।। ५ ।।

तैसा मान अपमान। लाभ हानि हे समान ॥ ६ ॥ तुका म्हणे याचें। नांव सोवळें हें साचें ॥ ७ ॥

३८७३. चित्ताचें बांधलें जवळी ते वसे। प्रकाशीं प्रकाशे सर्वकाळ ॥ १ ॥ अंतरीं वसावी उत्तम ते भेटी। होऊं कांहीं तुटी न शकेची ॥ २ ॥ ब्रह्मांड कवळे आठवणेसाठीं। धरावा तो पोटीं वाव बरा ॥ ३ ॥ तुका म्हणे लाभ घरिचिया घरीं। प्रेमतंतु दोरी न तुटतां ॥ ४ ॥

३८७४. नाहीं शब्दाधीन वर्म आहे दुरी। नव्हे तंत्री मंत्री अनुभव तो ॥१॥ हर्षामर्षा अंगीं आदळती लाटा। कामक्रोधें तटा सांडियेलें ॥ २ ॥ न सरे ते भक्ति विठोबाचे पायीं। उपरति नाहीं जेथें चित्ता ॥ ३ ॥ तुका म्हणे सुख देहनिरसनें। चिंतनें चिंतन तद्रूपता ॥ ४ ॥

३८७५. देह हा सादर पाहावा निश्चित। सर्व सुख एथें नाम आहे ॥ १ ॥ ब्रह्म जें देखणें द्वैत जेव्हां गेलें। शरीर तें झालें ब्रह्मरूप ॥ २ ॥ यजन याजन तप व्रतें करिती। विकल्पें नागवती शुद्ध पुण्या ॥ ३ ॥ तुका म्हणे सर्व सुख एथें आहे। भ्रांति दूर पाहे टाकूनिया ॥ ४ ॥

३८७६. साधावा तो देव सर्वस्वाचे साटीं। प्रारब्ध तुटी क्रियमाण ॥ १ ॥ मग कासयानें पुन्हां संवसार। बीजाचे अंकुर दग्ध होती ॥ २ ॥ जिणें दिल्हें त्यासी द्यावा पिंडदान। उत्तीर्ण चरण धरूनि व्हावें ॥ ३ ॥ तुका म्हणे निज भोगईल निजतां। नाहीं होईल सत्ता दुजियाची ॥ ४ ॥

३८७७. विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म। भेदाभेदभ्रम अमंगळ ॥ १ ॥ आइका जी तुम्ही भक्त भागवत। कराल तें हित सत्य करा ॥ २ ॥ कोणाही जीवाचा न घडावा मत्सर। वर्म सर्वेश्वरपूजनाचें ॥ ३ ॥ तुका म्हणे एका देहाचे अवयव। सुख दुःख जीव भोग पावे ॥ ४ ॥

३८७८. पुसावें तें ठाईं आपुल्या आपण। अहंकारा शून्य घालू-

नियां ॥१॥ येर वाग्जाळ मायेचा अहंकार । वचनाशीं थार अज्ञान ते ॥२॥ फळ तेंचि बीज बीज तेंचि फळ । उपनांवें मूळ न पालटे ॥ ३ ॥ तुका म्हणे अवघे गव्हांचे प्रकार । सोनें अळंकार मिथ्या नांव ॥ ४ ॥

३८७९. पंचभूतांचा गोंधळ । केला एके ठायीं मेळ । लाविला सबळ । अहंकार त्यापाठीं ॥ १ ॥ तेथें काय मी तें माझें । कोण वागवी तें ओझें । देहा केवीं रिझे । हें काळाचें भातुकें ॥ २ ॥ जीव न देखें मरण । धरी नवी सांडी जीर्ण । संचित प्रमाण । भोग शुभा अशुभासी ॥ ३ ॥ इच्छा वाढविते वेल । खुंटावा तो खरा बोल । तुका म्हणे मोल । झाकलें तों पावेल ॥ ४ ॥

३८८०. मी हें ऐसें काय जातो । अवघड किती पाहातां ॥१॥ नाहीं होत उल्लंघन । नसतां भिन्न दुसरें ॥२॥ अंधारानें तेज नेलें । दृष्टीखालें अंतर ॥३॥ तुका म्हणे सवें देव । घेतां ठाव दावील ॥४॥

३८८१. मुक्त कासया म्हणावें । बंधन तें नाहीं ठावें ॥ १ ॥ सुखें करितों कीर्तन । भय विसरलें मन ॥ २ ॥ देखिजेना नास । घालूं कोणावरी कास ॥ ३ ॥ तुका म्हणे साहे । देव आहे तैसा आहे ॥ ४ ॥

३८८२. रूप नांव माया बोलावया ठाव । भागा आले भाव तयावरी * ॥१॥ शींव वाटे परी न खंडे पृथिवी । शाहाणे ते जीवीं समजती ॥ २ ॥ पोटा आलें तिच्या लोळे मांडीवरी । पारखी न करी खंती चित्तीं ॥ ३ ॥ तुका म्हणे भक्तीसाठीं हरिहर । अरूपीच क्षरविभाग हे ॥ ४ ॥

३८८३. सुख सुखा विरजण झालें । तें मथिलें नवनीत ॥ १ ॥ ह्याले डोले हरुषे काया । निवती बाह्या नयन ॥ २ ॥ प्रबळ तो नारायण । गुणें गुण वाढला ॥ ३ ॥ तुका म्हणे भरली शींग । वरी मग वोसंडे ॥ ४ ॥

३८८४. कासया जी ऐसा माझे माथां ठेवा । भार तुम्ही देवा

* तयापरी.

संतजन ॥ १ ॥ विचित्र विंदानी नानाकळा खेळे। नाचवी पुतळे नारायण ॥ २ ॥ काय वानराचे अंगींची ते शक्ति। उदका तरती वरी शिळा ॥ ३ ॥ तुका म्हणे करी निमित्याचि आड। चेष्टवूनि जड दावी पुढें ॥ ४ ॥

३८८५. देवाची भांडारी। आदा विनियोग करी ॥ १ ॥ आतां नमाखे हातपाय। नेणों होतें कैसें काय ॥ २ ॥ देवें नेली चिंता। झाला सकळ करिता ॥ ३ ॥ तुका म्हणे धणी। त्यासी अवघी पुरवणी ॥ ४ ॥

३८८६. आतां येणेंविण नाहीं मज चाड। कोण बडबड करी वायां ॥ १ ॥ सुख तेंचि दुःख पुण्य पाप खरें। हें तों आम्हां बरें कळों आलें ॥ २ ॥ तुका म्हणे वाचा वाहिली अनंता। बोलायाचें आतां काम नाहीं ॥ ३ ॥

३८८७. बहुतां जातीचा केला अंगीकार। बहुतही फार सर्वोत्तमें ॥ १ ॥ सरलाची नाहीं कोणाचिये वेचें। अक्षोभ्य ठायींचें ठायीं आहे ॥२॥ लागताचि नाहीं घेतां अंतपार। वसवी अंतर अणूचेंही ॥ ३ ॥ तुका म्हणे केला होय ठाकी ऐसा। पुरवावी इच्छा धरिली ते ॥ ४ ॥

३८८८. नव्हे शब्द एक देशी। सांडी गिवशी कोणाला ॥१॥ झाली माझी वैखरी। विश्वंभरी व्यापक ॥ २ ॥ मोकलिलें जावें बाणें। भाता जेणें वाहिला ॥ ३ ॥ आतां येथें कैंचा तुका। बोले शिक्का स्वामीचा ॥ ४ ॥

३८८९. आपुलें तों कांहीं। येथें सांगिजेसें नाहीं ॥ १ ॥ परि हे वाणी वायचळे। छंद करविते बरळे ॥२॥ पंचभूतांचा हा मेळा। देह सत्यत्वें निराळा ॥ ३ ॥ तुका म्हणे भुली। इच्या उफराट्या चाली ॥ ४ ॥

३८९०. हीन शूर बुद्धीपासीं। आकृतीसी भेद नाहीं ॥ १ ॥ एक दांडी एक खांदी। पदोपदीं भोगणें ॥ २ ॥ एकाऐसें एक नाहीं। भिन्न पाहीं प्रकृती ॥ ३ ॥ तुका म्हणे भूमी खंडे। पीक दंडे जेथें तें ॥ ४ ॥

३८९१. देवासी तो पुरे एकभाव गांठी। तोचि त्याचे मिठी देईल पायीं ॥ १ ॥ पाहोनि राहीन कवतुकें निराळा। मी मजवेगळा होऊनियां ॥२॥ कांहीं नेघें शिरीं निमित्ताचा भार। नलगे उत्तर वेचावेंचि ॥ ३ ॥ तुका म्हणे जीवें पडिलिया गांठी। मग नाहीं मिठी सुटों येत ॥ ४ ॥

३८९२. जाय तिकडे लागे पाठी। नाहीं तुटी आठवाची ॥१॥ हिरोनियां नेलें चित्त। माझें थीत भांडवल ॥ २ ॥ दावूनियां रूप डोळां। मन चाळा लावियलें ॥ ३ ॥ आणीक तोंडा पडिली मिठी। कान गोठी नाइकती ॥ ४ ॥ बोलिल्याचा आठव न घडे। वाणी ओढे ते सोई ॥५॥ तुका म्हणे प्रेमधगी। भरली अंगीं अखंड ॥६॥

३८९३. देवाचे घरीं देवें केली चोरी। देवें देव नागवूनि केला भिकारी ॥ १ ॥ धांवणियां धांवा धांवणियां धांवा। मागचि नाहीं जावें कवणिया गांवा ॥ २ ॥ सवेंचि होता चोर घरिचिया घरीं। अवघें केलें वाटोळें फांवालियावरी ॥ ३ ॥ तुका म्हणे येथें कोणीच नाहीं। नागवलें कोण गेलें कोणाचें काई ॥ ४ ॥

३८९४. झालें आतां साठे। कासयाचें लहान मोठे ॥ १ ॥ एक एका पडिलों हातीं। झाली तेव्हांची निश्चिंती ॥ २ ॥ नाहीं फिरों येत मागें। झालें साक्षीचिया अंगें ॥ ३ ॥ तुका म्हणे देवा। आतां येथें नाहीं हेवा ॥ ४ ॥

३८९५. वचनें ही नाड। न बोलते मुकें खोड ॥ १ ॥ दोहीं वेगळें तें हित। बोली अबोलणी नीत ॥२॥ अंधार प्रकाशी। जाय दिवस पावे निशी ॥३॥ बीज पृथिवीच्या पोटीं। तुका म्हणे दावी दृष्टी ॥ ४ ॥

३८९६. वसवावें घर। देवें बरें निरंतर ॥ १ ॥ संग आसनीं शयनीं। घडे भोजनीं गमनीं ॥ २ ॥ संकल्प विकल्प। मावळोनि पुण्यपाप ॥ ३ ॥ तुका म्हणे काळ। अवघा गोविंदीं सुकाळ ॥ ४ ॥

३८९७. याजसाठीं भक्ति। जगीं रूढवावया ख्याति ॥ १ ॥ नाहीं तरी कोठें दुजें। आहे बोलावया सहजें ॥ २ ॥ गौरवावया-

४५६२. भरणी आली मुक्त पेठा । करा लाटा व्यापार ॥ १ ॥ उधार घ्या रे उधार घ्या रे । अवघे या रे जातींचे ॥ २ ॥ येथें पंक्तिभेद नाहीं । मोठे कांहीं लहान ॥ ३ ॥ तुका म्हणे लाभ घ्यावा। मुद्दल भावा जतन ॥ ४ ॥

४५६३. भक्तिवीण जिणें जळो लाजिरवाणें । संसार भोगणें दुःखमूळ ॥ १ ॥ एक एक योनी कोटि कोटि फेरा । मनुष्यदेहवारा मग लागे ॥ २ ॥ वीस लक्ष योनि वृक्षांमाजी घ्याव्या । जलचरी भोगाव्या नवलक्ष ॥ ३ ॥ अक्रा लक्ष योनि किड्यांमाजी घ्याव्या । दश लक्ष भोगाव्या पक्ष्यांमध्यें ॥ ४ ॥ तीस लक्ष योनि पशूंचिये घरीं । मानवाभीतरीं चार लक्ष ॥ ५ ॥ तुका म्हणे तेव्हां नरदेह नरा । तयाचा मातेरा केला मूढें ॥ ६ ॥

४५६४. भक्तीचिया पोटीं बोध कांकडा ज्योति । पंचप्राण जीवेंभावें ओवाळूं आरती ॥ १ ॥ ओवाळूं आरती माझ्या पंढरी-नाथा । दोन्ही कर जोडोनि चरणीं ठेवीन माथा ॥ २ ॥ काय माहिमा वर्णूं आतां सांगणें तें किती । कोटि ब्रह्महत्या मुख पाहातां जाती ॥ ३ ॥ राही रखुमाई दोन्ही दोंबाहीं । मयूरपिच्छचामरें ढळिती ठायीं ठायीं ॥ ४ ॥ तुका म्हणे दीप घेउनी उन्मनती शोभा । विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ॥ ५ ॥

समाप्त

# अभंगांची सूचि

फ

## पुरवणी



---